<u>सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.११</u>
**पोलीस शिपाई पदांच्या बदल्यांबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः न्यायाप्र ३११५/प्र. क्र. ८८/पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १ जुलै २०१५

<u>वाचा-</u>

**१) महाराष्ट्र शासन राजपत्र, असाधारण भाग चार, दि.६.४.२०१५ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेले असाधारण क्र.१५ मधील सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ११.**

**परिपत्रक -**

माननिय सर्वोच्च न्यायालयाने रिट विनंतीअर्ज (दिवाणी) क्र. ३१०/१९९६ मध्ये दि.२२.९.२००६ मध्ये दिलेल्या न्याय निवाडयास अनुसरुन, महाराष्ट्र शासनाने, महाराष्ट्र पोलीस अधिनियम, १९५१ मध्ये सुधारणा करण्याबाबत महाराष्ट्र पोलीस (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०१५ आणि महाराष्ट्र पोलीस (सुधारणा) अधिनियम, २०१५ अनुक्रमे दि.१.२.२०१४ आणि दि.१६.२.२०१५ रोजीपासून अंमलात आणले आहेत. महाराष्ट्र पोलीस (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०१४ मधील कलम २२न(क)(१) मधील तरतुदींनुसार पोलीस दलातील पोलीस कर्मचारीवर्गाचा एका पदावरील किंवा एका कार्यालयातील सामान्य पदावधी हा पदोन्नती आणि नियम सेवावधी यांच्या अधीनतेने दोन वर्षे इतका असेल अशी तरतुद होती. सदरहू तरतुद महाराष्ट्र पोलीस (सुधारणा) अधिनियम, २०१५ अन्वये वगळण्यात आली असून त्याऐवजी सुधारीत तरतुद विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार पोलीस दलातील विविध संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांचा सामान्य पदावधी हा पदोन्नती आणि नियत सेवावधी यांच्या अधीनतेने वेगवेगळा करण्यात आला आहे. त्यामधील पोलीस शिपाई पदावरील कर्मचाऱ्यांच्या सामान्य पदावधीबाबत व त्यानुसार होणाऱ्या बदल्यांमध्ये स्थानिक पातळीवर संभ्रम झाल्यामुळे खालीलप्रमाणे स्पष्टीकरण करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र पोलीस (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०१४ मधील कलम २२न(क)(१)(एक) मधील तरतुदींनुसार पोलीस दलातील पोलीस कर्मचारीवर्गाचा एका पदावरील किंवा एका कार्यालयातील सामान्य पदावधी हा पदोन्नती आणि नियतसेवावधी यांच्या अधीनतेने दोन वर्षे इतका विहीत करण्यात आला होता. त्यामध्ये सुधारणा करुन, महाराष्ट्र पोलीस (सुधारणा) अधिनियम, २०१५ मधील परि-६ नुसार, मुख्य अधिनियमाच्या कलम २२न(क)(१) मध्ये नवीन उपकलम (अ), (ब), (क), (ड) व (ई) समाविष्ट करण्यात आले आहे. त्याद्वारे विविध संवर्गातील पदांचा सामान्य पदावधीमध्ये फेरबदल करण्यात आले आहेत. मुख्य अधिनियमाच्या कलम २२न(क)(१) मधील उपकलम (ब) नुसार पोलीस शिपाई पदाचा एका पदावरील किंवा एका कार्यालयातील सामान्य पदावधी हा पदस्थापनेच्या एका ठिकाणावर पाच वर्षे इतका असेल अशी तरतुद आहे. तथापि असे निदर्शनास आले आहे की, काही जिल्हयांत सर्व शिपाई यांच्या बदल्या तीन वर्षांनंतरच करण्यात आल्या आहेत.

३. अधिनियमांमधील उपरोक्त तरतुद ही स्वयंस्पष्ट असून तरतुदीमध्ये पोलीस दलातील कोणत्याही शाखा/युनिटचा उल्लेख केलेला नाही. त्यामुळे सदरहू तरतुद पोलीस दलातील विशेष शाखा, नक्षलविरोधी पथक, दहशतवाद विरोधी पथक, गुन्हे शाखा, स्थानिक गुन्हे शाखा, शहर वाहतूक शाखा, सुरक्षा शाखा, काऊंटर टेरर युनिट, बॉम्ब शोधक व नाशक पथक, पोलीस नियंत्रण कक्ष इत्यादी व अशाप्रकारच्या पोलीस शिपाई कार्यरत असलेल्या इतर सर्व शाखा/युनिट यांना लागु होते.

४. पोलीस दलातील कोणत्याही शाखा/ युनिटमधील पोलीस शिपाई या पदावर एखादया कर्मचाऱ्याची पदस्थापना झाल्यानंतर, तो कर्मचारी पदस्थापनेच्या ठिकाणी सामान्यत: जास्तीतजास्त पाच वर्षे कालावधीपर्यंत राहू शकतो. तथापि प्रशासकीय कारणास्तव वा अन्य कारणास्तव संबंधित आस्थापना मंडळाच्या शिफारशीनुसार आणि सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने संबंधित पोलीस शिपाई याची बदली सामान्य पदावधी पूर्ण होण्यापूर्वी देखील होवू शकते.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०११६३२११००२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.07.01 16:34:24 +05'30'

**(द. ह. कदम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान महालेखाकार (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र, १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
यांना विनंती आहे की, सदरहू परिपत्रक आपल्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख/घटकप्रमुख यांच्या निदर्शनास आणावे व त्याचे काटेकोर पालन होईल याची दक्षता घ्यावी.
८. सर्व अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

९. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, वरळी, मुंबई
१०. सर्व पोलीस आयुक्त (लोहमार्गसह)
११. आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई
१२. सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक
१३. सर्व पोलीस अधीक्षक (लोहमार्गसह)
१४. सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण विद्यालये,
१५. सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल
१६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालस, मुंबई
२०. गृह विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कार्यासन अधिकारी
२१. गृह विभागाच्या अधीनस्त असलेले सर्व विभागप्रमुख/कार्यालयप्रमुख
२२. निवडनस्ती/पोल-३